पूर्व उच्च प्राथमिक शिष्यवृत्ती परीक्षा (इयत्ता ५ वी) व पूर्व माध्यमिक शिष्यवृत्ती परीक्षा (इयत्ता ८ वी) या परीक्षेच्या प्रवेश शुल्कात व परीक्षा शुल्कात वाढ करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- एफईडी -४०१४/६४३/प्र.क्र.४/एसडी-५**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२
दिनांक :- ११ नोव्हेंबर, २०२१

**वाचा :-**

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्रमांक एफईडी -४०१४/६४३/प्र.क्र.४/एसडी ५, दिनांक १५.११.२०१६

२) आयुक्त,महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद,पुणे यांचे पत्र क्र. मरापप/शिष्यवृत्ती/२०१७/४४७६ , दिनांक १/०८/२०१७, व क्र.मरापप/शिष्यवृत्ती/२०१७/५८२९ ,दिनांक ७/१०/२०१७ व मरापप/शिष्यवृत्ती/२०२१/२१०२, दिनांक १६.०७.२०२१

**प्रस्तावना :-**

सन २०१६-१७ या शैक्षणिक वर्षापासून इयत्ता ५ वी व इयत्ता ८वी या इयत्तेकरिता घेण्यात येणाऱ्या शिष्यवृत्ती परीक्षेकरिता दिनांक २२.०७.२०१० च्या शासन निर्णयामधील प्रचलित अटी व शर्तीमध्ये दि.१५.११.२०१६ च्या शासन निर्णयान्वये सुधारणा केल्या आहेत. त्यानुसार बिगर मागासवर्गीय विद्यार्थ्यांसाठी प्रवेश शुल्क रु. १०/- वरुन रु. २०/- करण्यास तसेच परीक्षा शुल्क रु. ५०/- वरुन रु. ६०/- करण्यास मान्यता देण्यात आली होती व मागासवर्गीय व दिव्यांग विद्यार्थ्यांसाठी प्रवेश शुल्क रु. १०/- वरुन रु. २०/- करण्यास मान्यता देण्यात आली होती.

शिष्यवृत्ती परीक्षेसाठी आवेदनपत्रे भरणे, प्रश्नपत्रिका व उत्तरपत्रिकांची छपाई, उत्तरपत्रिकांचे स्कॅनिंग, निकाल जाहीर करणे, गुणवत्ता याद्या तयार करणे इत्यादी कामकाजासाठी संगणकीय प्रणालीचा वापर करण्यात येतो. त्यानुसार, शिष्यवृत्ती परीक्षेच्या प्रवेश शुल्क व परीक्षा शुल्कात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पूर्व उच्च प्राथमिक शिष्यवृत्ती परीक्षा (इयत्ता ५ वी ) व पूर्व माध्यमिक शिष्यवृत्ती परीक्षा (इयत्ता ८ वी ) या परीक्षेच्या प्रवेश शुल्क व परिक्षा शुल्कामध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| क्र | शुल्क | शासन निर्णय दि. १५.११.२०१६ नुसार शुल्क | | सुधारीत शुल्क | |
|---|---|---|---|---|---|
| | | बिगरमागास विद्यार्थ्यांसाठी | मागास व दिव्यांग विद्यार्थ्यांसाठी | बिगरमागास विद्यार्थ्यांसाठी | मागास व दिव्यांग विद्यार्थ्यांसाठी |
| १ | प्रवेश शुल्क | रु.२०/- | रु. २०/- | रु. ५०/- | रु. ५०/- |
| २ | परीक्षा शुल्क | रु.६०/- | शुल्क नाही. | रु.१५०/- | रु.७५/- |

२. सदरचे सुधारीत शुल्क हे शासन आदेशाच्या दिनांकापासून लागू राहातील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११११७४२३२९८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, serialNumber=01d5ac9d227fcf738d4d5a366976c83175db4f058411807fb1031c17dd155677, cn=RAJENDRA SHANKARRAO PAWAR
Date: 2021.11.11 17:47:07 +05'30'

**( राजेंद्र शं. पवार )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक
२. मा.अपर मुख्य सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक
३. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
४. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. शिक्षण संचालक (प्राथमिक),शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. आयुक्त, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
८. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक),जिल्हा परिषद
९. शिक्षण निरिक्षक (दक्षिण/उत्तर/पश्चिम),मुंबई
१०. सर्व वरिष्ठ लेखापरीक्षक (शिक्षण विभाग)
११. महालेखापाल १ व २ (लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर
१२. महालेखापाल १ व २ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
१३. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१४. मुंबई लेखा परीक्षक,स्थानिक निधी लेखा,महाराष्ट्र राज्य,कोकण भवन,मुंबई
१५. संचालक, लेखा व कोषागार कार्यालय
१६. लेखा परीक्षक,स्थानिक निधी लेखा,मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद
१७. निवडनस्ती (एसडी.-५)